एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी
केंद्र पुरस्कृत अभियान अंतर्गत अनुसूचित
जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत
( केंद्र हिस्सा - २४०१ ए ०२९)
( राज्य हिस्सा - २४०१ ए ०११)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.राफअ-२०२२/प्र.क्र.२२९/९-अे**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२३

**संदर्भ:-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल, २०२२ व दि.०८/०२/२०२३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: राफअ २०२२/प्र.क्र.१०३/९-अे, दि. ०३ जून, २०२२
3) केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्र F.No. 18-24/2017-MIDH(E), Dated:03,February.2023.
४) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/लेखा/दुसरा हप्ता मागणी/४४४४/२०२३, दिनांक ०७.०२.२०२३ रोजीचे पत्र.
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र: बीयुडी-२०२२/प्र.क्र.७/कार्यासन ६, दि.१७ मार्च,२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल २०१४ पासून राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (NHM), उत्तर पूर्व आणि हिमालयीन राज्यासाठी फळबाग अभियान (HMNEH), राष्ट्रीय बागवानी मंडळ (NHB), नारळ विकास मंडळ (CDB) व केंद्रीय फलोत्पादन संस्था (CIH) या सर्व योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (Mission for Integrated Development of Horticulture) राबविण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजना ही फळे, भाजीपाला, कंदमुळे, मश्रूम, मसाले, फूल, सुगंधी वनस्पती, नारळ, काजू, कोको आणि बांबू इ. उत्पादनांच्या चतुरस्त्र विकासाकरिता राबविण्यात येणारी केंद्रपुरस्कृत योजना आहे. सदर योजना सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे.

राज्यात एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी रु.१९९,३३,९७,०००/- रक्कमेच्या वार्षिक कृती आराखडयास संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये अनुसुचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा निधी रु. १,८९,००,०००/- निधी राज्य शासनास वितरित केला असून त्या समरुप राज्य शासनाचा रु. १,२६,००,०००/- निधी असा एकूण रु. ३,१५,००,०००/- एवढा निधी आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. उक्त निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाची सन २०२२-२३ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्शाचा रु.१,८९,००,०००/- निधी व त्यास समरुप राज्य हिश्शाचा रु. १,२६,००,०००/- निधी असा एकूण रु. ३,१५,००,०००/- (रुपये तीन कोटी पंधरा लाख फक्त) इतका निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पित निधी केंद्र शासनाने विहीत केल्याप्रमाणे अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसुचित जमाती | मागणी क्र. - टी -०५<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७९६) - जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०६) - एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान (६० टक्के केंद्रीय हिस्सा) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A०२९) | मागणी क्र. - टी -०५<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७९६) - जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०७) - एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A०११) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषी) यांनी शासनास सादर करावे.

५. योजनेंतर्गत वितरित निधी जिल्हा स्तरावरुन खर्च करण्यात यावा. सदर निधीतून अनुसूचित जमाती घटकांतील लाभार्थ्यांकरिता खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

६. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, शासन निर्णय, आदिवासी

विकास विभाग, क्रमांक: बीयुडी-२०२२/प्र.क्र.७/कार्यासन ६, दिनांक १७ मार्च, २०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२०१८४३३११००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB60428DE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.20 18:48:52 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती :-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४) सर्व सन्माननीय विधानपरिषद / विधानसभा सदस्य,महाराष्ट्र राज्य.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ० ३२,
७) अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) प्रधान सचिव (कृषि), कृषि प पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे,
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
१३) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१४) राज्यातील सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१५) राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१६) कक्ष अधिकारी, कार्यासन ६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७) कक्ष अधिकारी, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.
१८) कक्ष अधिकारी, कार्यासन (अर्थसंकल्प-१९, व्यय १४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.
१९) विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती,
२०) राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
२१) निवडनस्ती, कार्यासन ९-अे.